**मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या अधिकृत भागभांडवलात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मौआम-२०२१/प्र.क्र.२२/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२२

वाचा -

१) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्रमांक इएसई-१०९९/प्र.क्र.३६८/रोस्वरो-१, दि.१३ मार्च, २००१.
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक -२००८/१७१०/प्र.क्र. २३०/०८/का. १, दि.१७ जानेवारी, २००९
३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक -२००८/१७१०/प्र.क्र. २३०/०८/का. ८, दि.१७ नोव्हेंबर, २००९, दि.२१ जून, २०११ व दि.६ जून, २०१३

**प्रस्तावना :-**

राज्यातील मुस्लीम तसेच अल्पसंख्यांक समाजातील आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकांच्या उन्नतीसाठी राज्य शासनाने मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाची स्थापना केली आहे. मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रु.५००.०० कोटी इतके आहे. या भागभांडवलामधूनच अल्पसंख्यांकांच्या सामाजिक व आर्थिक उन्नतीसाठी विविध योजनांअंतर्गत कर्ज उपलब्ध करुन दिले जाते. महामंडळाच्या अधिकृत भागभांडवलात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

याअनुषंगाने मा. मंत्रीमंडळाने दि.२० जानेवारी, २०२२ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या अधिकृत भागभांडवलात वाढ करुन ते रु.५००.०० कोटी वरुन रु.७००.०० कोटी करण्यास पुढील अटींच्या अधिनतेने याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

१) अतिरिक्त रु.२००.०० कोटी भागभांडवल टप्प्याटप्प्याने महामंडळास उपलब्ध करुन देण्यात येईल.
२) महामंडळाकडून राबविण्यात येणा-या योजना तसेच वितरीत भागभांडवल याबाबत महामंडळाच्या अध्यक्षस्तरावर / विभागस्तरावर नियमितपणे आढावा घेण्यात यावा. तसेच याबाबतचा तपशिल नियोजन व वित्त विभागास सादर करण्यात यावा.

३) प्राप्त होणा-या अतिरिक्त भागभांडवलाचा विनियोग केवळ महामंडळाकडून राबविण्यात येणा-या योजनांकरीताच करण्यात येईल. इतर कोणत्याही बाबींकरिता याचा दुरुपयोग होणार नाही, याबाबतची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

३. सदर प्रस्तावास अनौपचारिक संदर्भ क्र. २३१/१४७१, दिनांक ३० जून, २०२१ अन्वये नियोजन विभागाची तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. ६६/सा.उ., दिनांक २८ सप्टेंबर, २०२१ अन्वये वित्त विभागाची सहमती प्राप्त झालेली आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१४१६०७११७४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.02.14 16:09:14 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा.मंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. अध्यक्ष, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ , मुंबई.
७) अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) व्यस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ , मुंबई.
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१४, व्यय-१ व साउ) मंत्रालय, मुंबई
१०) नियोजन विभाग (कार्या.१४७१), मंत्राल, मुंबई
११) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा व परीक्षा),मुंबई
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४) अवर सचिव, कार्यासन-७, कार्यासन-५ अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई .
१५) निवड नस्ती, कार्यासन-८.